**चंद्रपूर जिल्हयातील बल्लारपूर मार्गावर विसापूर येथे बंगलोरच्या धर्तीवर बॉटनिकल गार्डन निर्माण करणे विविध कामाचे अवस्था-१ चे अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:वनबां-२०१८/प्र.क्र.४६७/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- २० डिसेंबर, २०१८**

**वाचा :-** १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/वअं/लेखा/प्रमं./प्र.क्र.६६/८२७/२०१८-१९, दिनांक २७.११.२०१८.

**प्रस्तावना:-**

चंद्रपूर जिल्हयातील बल्लारपूर मार्गावर विसापूर येथे बंगलोरच्या धर्तीवर बॉटनिकल गार्डन निर्माण करणेसाठी विविध कामाचे अवस्था-१ चे अंदाजपत्रकांना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत शासनास विनंती केली आहे.

सदरील अंदाजपत्रकाची तांत्रिक पडताळणी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, नागपूर यांनी केलेली असून त्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन दिनांक २६.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव विचारात घेता चंद्रपूर जिल्हयातील बल्लारपूर मार्गावर विसापूर येथे बंगलोरच्या धर्तीवर बॉटनिकल गार्डन निर्माण करणे विविध कामाचेअवस्था-१ चे १२ अंदाजपत्रका मधील खालील अंदाजपत्रकांना सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस व सदर बांधकामाचा खर्च विभागाकडे योजनेंतर्गत उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा, या अटीच्या अधिन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.:-

| **अ.क्र.** | **कामाचे तपशील** | **प्रशासकीय मान्यता प्रदान केलेले रक्कम रुपये** |
|---|---|---|
| १ | Construction of BUGGY Stand Aquascape, art Instalation & Internal Furniture at Botanical Garden, Visapur, Tah.Ballarpur, Dist. Chandrapur | ६,०६,०८,०००/- |
| २ | Supply and Installation of Signages in Various Area, Wild Animals, Birds & Display Boxes in Museaum of Botanical Garden, Visapur, Tah.Ballarpur, Dist.Chandrapur | २,७६,००,०००/- |
| ३ | Providing Systems such as FAS, PA, ACS, CCTV & Network & Passive Security System works for Botanical Garden, Visapur, Tah.Ballarpur, Dist. Chandrapur | ३,५५,१०,२७६/- |
| | **एकूण :-** | **१२,३७,१८,२७६/-** |

सदर प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने खालील विहीत केलेल्या अटी व शर्तीचे पालन करणे संबंधितावर बंधनकारक राहील:-

१. अंदाजपत्रक व नकाशे उपभोक्ता विभागांच्या सक्षम प्राधिका-यांकडून सांक्षाकित करुन घ्यावीत.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
५. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्या़ येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२०१३४०४३३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.12.20 13:46:15 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक(प्रा.), चंद्रपूर
४. उपवनसंरक्षक, मध्य चांदा, चंद्रपुर
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)